# डॉल्फिन

रॉबर्ट ए. मॉरिस

चित्र: मोमोरू फुनाई, मराठी: अश्विनी बर्वे



# डॉल्फिन

रॉबर्ट ए. मॉरिस

चित्र: मोमोरू फुनाई, मराठी: अश्विनी बर्वे





सकाळ झाली आहे.

आकाशात तेजस्वी सूर्य चमकत आहे.

समुद्र शांत आहे.

ट्वीट! ट्वीट! ट्वीट!

असा आवाज़ डॉल्फ़िन करतात.

तेव्हा ते खूप उत्साहित आहे.

ते एका मोठ्या डॉल्फ़िन मादीच्या
चारी बाजूला पोहत आहेत.

ती बाळाला जन्म देणार आहे.





सगळ्यात आधी, तिच्या शरीरातून

एक छोटी शेपटी निघते.

मग अचानक तिचे बाळ जन्माला येते.

ते तीन फुट लांब आहे.

आई डॉल्फिन आठ फुट लांब आहे.

बाळ  डॉल्फ़िनला “बाळा” म्हणतात.

मोठ्या आई डॉल्फिनला "काऊ“ म्हणतात.

मोठया नराला "बुल" म्हणतात.

नवीन बाळ नर आहे.





डॉल्फ़िन स्तनधारीप्राणी आहेत .

ते हवेत श्वास घेतात.

नवीन बाळाला लवकरच हवेत श्वास घ्यावा लागेल.

नाहीतर तो बुडेल.

आई डॉल्फिन लवकरच आपल्या बाळाच्या खालून पोहू लागली.

ती हळूच त्याला पाण्याच्या वर ढकलत आहे.

स्विश! स्विश!

बाळ हवेत पहिला श्वास घेतला.

त्याचे नाक त्याच्या डोक्यावर आहे.

त्याला "ब्लोहोल" म्हणतात.

आता बाळ स्वतः पोहते, जेव्हा त्याला गरज असेल तेव्हा ते हवेत येऊन श्वास घेते.

बाळाला भूक लागते तेव्हा ते आईच्या जवळ पोहायला लागतो.

आई बाळाच्या बाजूला वळते.

बाळ तिचे गरम दूध पिते.



व्हिर्र! व्हिर्र! व्हिर्र!

डॉल्फ़िनला एक नवा आवाज ऐकू आला.

ते एक जहाज आहे.

त्याच्याकडे येत आहे.

बाळ डॉल्फ़िन आपल्या आईच्या कुशीत पोहत राहते.





बाळ पोहण्यात एकदम तरबेज आहे.

बाळ डॉल्फ़िन आपली शेपूट वर-खाली हलवतो.

पर त्याला पाण्यातून पुढे ढकलतात.

त्याच्या पाठीवरचा पंख /फिन त्याला उलटा होण्यापासून वाचवतो.

त्याच्या पुढच्या पंखांना ‘फ्लिपर्स’ म्हणतात.

छोटा डॉल्फिन त्याचा उपयोग वरखाली पोहण्यासाठी आणि डाव्या-उजव्या बाजूला वळण्यासाठी करतो.

आई आणि मुलगा वेगाने पोहतात.

ते जहाजाच्या समोर पोहचतात.

मग पोहणे बंद करतात.

मग ते जहाजामुळे तयार होणाऱ्या
लहरीवर स्वार होतात.



इतर डॉल्फ़िनसुद्धा त्यांच्याबरोबर येतात.

ते खोल बुडी मारतात, उड्या मारतात आणि लाटांवर खेळतात.

त्यांची त्वचा गुळगुळीत आणि तजेलदार असते त्यामुळे त्यांना पोहणे सोप्पे जाते.





अंधार होत आहे.

आता डॉल्फ़िन जहाजापासून दूर पोहतात.

कारण आता आराम करण्याची वेळ झाली आहे. छोटा आपल्या आईला हाक मारतो.

ट्वीट! ट्वीट! ट्वीट!

त्याला आपल्या आईच्या दुधाची भूक लागली आहे.

डॉल्फ़िन पाण्यावर आराम करतात आणि श्वास घेतात.

ते कितीतरी तास आराम करतील.

छोटा डॉल्फ़िन आपले डोळे बंद करून घेतो त्याच्यासाठी तो एक मोठा दिवस होता.



दुसऱ्या दिवशी सकाळी आई डॉल्फ़िनला भूक लागली आहे.

तिला आपल्यासाठी अन्न शोधावे लागेल.

डॉल्फ़िन समुहाने शिकार करतात.

डॉल्फ़िनच्या समूहाला "पॉड" म्हणतात.

"पॉड“ रोज अन्नाचा शोध घेतात.

ते मासे, झिंगा आणि छोटे स्क्विड खातात.

आज त्यांना मैकेरलचा एक मोठा कळप सापडतो.



मॅकेरल त्यांच्यापासून लांब पोहतात.

पण डॉल्फ़िन त्यांच्यापेक्षा वेगवान आहेत.

त्यांच्यातले काही डॉल्फ़िन माशांच्या कळपाच्या खालून पोहतात.

काहीजण डाव्या बाजूने तर काही उजव्या बाजूने पोहतात.

आता मॅकेरल सगळे एकत्र आहेत आणि डॉल्फ़िनसाठी त्यांना पकडणे सोप्पं आहे.





एक घायाळ मासा छोट्या डॉल्फ़िनच्या जवळून पोहत आहे.

छोटा त्याला लगेच पकडतो.

पण तो मासा खूप मोठा आहे.

छोटा त्याला आपल्या तोंडात पकडू शकत नाही म्हणून तो मासा पळून जातो.

चुरप! चुरप! चुरप!

हा एका किलर व्हेलचा आवाज़ आहे.

किलर व्हेल डॉल्फ़िनचा शत्रू आहे.

तो सील, मोठे मासे आणि डॉल्फ़िनला खाते.





सप! सप! सप!

एक डॉल्फ़िन आपल्या शेपटीने पाण्यावर वार करतो.

तो एक धोक्याचा संकेत आहे.

आई डॉल्फ़िन वेगाने आपल्या मुलाजवळ जाते.



सगळे डॉल्फ़िन पोहत दूर निघून जातात.

ते वेगाने पोहतात.

पण किलर व्हेल अजून त्यांच्या जवळ येत आहे.

छोटा डॉल्फ़िन थकला आहे.

काही बुल डॉल्फिन, मुलांच्या सुरक्षेसाठी त्यांच्याजवळून पोहत आहेत.





मग किलर व्हेल

मॅकेरलच्या मोठ्या समुहाकडे बघतो.

तो त्यांचा पाठलाग करतो.

डॉल्फ़िन पोहत दुसरीकडे निघून जातात.

आता ते सुरक्षित आहेत.

दिवसेंदिवस छोटा आता मोठा होत आहे.
तो आता सहा महिन्याचा आहे.

तो चार फुटाहून अधिक लांब आहे.

जेव्हा तो दोन वर्षाचा होईल तेव्हा तो

आपल्या आई इतका लांब होईल.





कधी कधी आई डॉल्फ़िन आपल्या
छोट्याला अन्न आणण्यासाठी जाते
तेव्हा त्याला एकट्याला सोडून जाते.

तेव्हा इतर दोन मादी डॉल्फ़िन
छोट्याची काळजी घेतात.

त्या आई डॉल्फ़िनच्या मुलाची
देखभाल करण्यासाठी मदत करतात.

छोटा डॉल्फ़िन आपल्या आई
इतके खोलवर जाऊ शकत नाही.

तो फक्त तीन मिनिटासाठी
पाण्याच्या आत राहू शकतो.

आई डॉल्फ़िन शंभर फुट खोल
बुडी मारू शकते.

पाण्याच्या आत खोलवर पाणी
खूप थंड असते.

पण तिच्या त्वचेच्या खाली
चरबीचा एक मोठा थर असतो,
ती चरबी त्याला गरम ठेवते.

आई डॉल्फ़िन सहा मिनिटापर्यंत
पाण्याच्या आत राहू शकतात.



आई डॉल्फिन आपल्या तोंडात एक
मासा घेऊन परत येते.

ती माशाला सोडून देते.

तिला वाटते की छोट्याने स्वतः
मासा पकडावा.



छोटा माशाचा पाठलाग करतो.

आणि त्याला आपल्या दाताने पकडतो.
आता त्याचे छोटे डात छोट्या
मुलासारखे राहिलेले नाहीत.

तो त्यांना आयुष्यभर सांभाळेल.

जसजसा तो मोठा होईल तसतसे
त्याचे दात मोठे होतील.

छोटा माशाला चावत नाही, तो त्याला
पूर्ण गिळून टाकतो.



व्हिर्र! व्हिर्र! व्हिर्र!

झिंगा (श्रिम्प) पकडणारी नाव येत आहे.

नावेतली माणसं मोठमोठे जाळं ओढतात.

जाळ्यात झिंगे आणि मासे अडकतात.

ते लोक त्यातून फक्त झिंगे घेतात.

पण त्यांना मासे नको होते.

ते माशांना समुद्रात परत फेकून देतात.

डॉल्फ़िन वेगाने पोहतात आणि फेकलेले मासे खाऊन टाकतात.



कधी-कधी पाणी घाण असते, तेव्हा डॉल्फ़िनला मासे बघू शकत नाही.

क्लिक! क्लिक! क्लिक!

डॉल्फ़िन विशेष आवाज काढतात.

ते आवाज पाण्यात जातात.

त्या आवाजांची टक्कर माशांशी होते आणि परत डॉल्फ़िनला जाऊन टक्कर होते.





या आवाजामुळे डॉल्फ़िनला कळते की मासे कुठे आहेत.



क्लिक! क्लिक! क्लिक!

छोटा डॉल्फ़िन छोट्या माशांना खात पुढे-मागे पोहते.

अचानक, चिखलाच्या पाण्यात त्याला एक मोठा जीव दिसतो.

तो आई  डॉल्फ़िनपेक्षा खूप मोठा आहे.

तो एक विशाल टायगर शार्क आहे.

शार्क सुद्धा माशांच्या मागे आहे.

सप! सप! सप!

त्यातला एक डॉल्फ़िन धोक्याचा आवाज काढतो.

खूप वेळ झाला आहे.

शार्क, छोटा डॉल्फ़िनला फ़्लिपरने पकडतो.

छोटा डॉल्फिन घायाळ होतो.

त्याच्या फ्लिपरचा वरचा भाग तुटतो.



कितीतरी बुल डॉल्फ़िन, शार्ककडे पोहत येतात.

ते शार्कला त्यांच्या तोंडाच्या टोकाने मारतात.
शार्कला जखम होते.

तो पोहत दुसरीकडे निघून जातो.



छोट्या डॉल्फिनला हवेची गरज आहे.

दोन डॉल्फिन त्याच्या खाली पोहतात.

ते त्याला पाण्याच्या वर ढकलतात.

आता तो श्वास घेऊ शकतो.

डॉल्फिनचा कळप छोट्याच्या रक्षणासाठी त्याच्याजवळ थांबतो.

त्याला जास्त लागत नाही.

त्याचे फ्लिपर लवकरच ठीक होईल.





ट्वीट! ट्वीट! ट्वीट!

आई डॉल्फिन बोलवत आहे.

छोटा डॉल्फिन त्याच्याजवळ पोहत आहे. दूध पिण्याची वेळ झाली आहे.

एक वर्षानंतर डॉल्फिनच्या बाळाला दुधाची गरज लागणार नाही.

तो स्वतः स्वतःची देखभाल करू शकेल.



डॉल्फिन तीस वर्षापर्यंत जिवंत राहू शकतो.

तो खूप काळ कळपाबरोबर राहिल.

अंत